प्रादेशिक पर्यटन विकास पंचवार्षिक योजनेअंतर्गत राज्यातील पर्यटन स्थळांच्या कामांना व आराखड्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

गृह विभाग (पर्यटन)

शासन निर्णय, क्रमांक एमटीसी २००४/११/प्र.क्र.४६३/पर्यटन,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक २६ सप्टेंबर, २००५.

**वाचा:-** १) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक एमटीसी २००४/७/प्रक्र.३०१ व ३३२/पर्यटन, दिनांक २१.०८.२००४ चे (दोन शासन निर्णय)

२) शासन निर्णय, गृह विभाग क्र. एमटीसी २००३/७/प्रक्र.२११/पर्यटन, दिनांक २१.८.२००४ चे ( दोन शासन निर्णय,)

३) कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग महाड विभाग यांचे पत्र क्र. का-४/ ३३८४/दि. १.७.२००४ व क्र. का-३(३) दिनांक १०.१२.२००४

**प्रस्तावना:-** कोकण विकास पॅकेज तसेच प्रादेशिक पर्यटन विकास योजनेअंतर्गत पाली पाटणूस रस्त्यासाठी सन २००४-०५ या आर्थिक वर्षात रु. ११.८० लाखाचा निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. या रस्त्यातील कि. मी. ८/२०० ते कि. मी. ११/०० यासाठी येणा-या रु. ५२,४०,१७२/- च्या खर्चाच्या अंदाजपत्रके व नकाशे इ.स प्रशासकीय मान्यता देण्याचा तसेच त्यासाठी निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावाचा विचार करुन शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-** वित्तीय अधिकार नियम पुस्तिका- १९७८ अ.क्र. ४ परिच्छेद-२७ (२)(अ) मधील भाग-१, उपविभाग-३ अन्वये प्रशासकीय विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये कार्यकारी अभियंता यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील प्रस्तावित केलेल्या खालील पर्यटन स्थळांच्या विकास कामास व रु.५२,४०,१७२/- लाखाच्या खालील चार कामांच्या अंदाजपत्रकास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून या आदेशान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नांव | अंदाजित रक्कम |
|---|---|---|
| १ | पाली पाटणूस रस्ता रा. मा. १३ कि. मी. ८/२०० ते ९/०५० रुंदीकरण करणे. | रु. १५,६१,३४१/- |
| २ | पाली पाटणूस रस्ता रा. मा. १३ कि. मी. ९/०५० ते ९/६०० रुंदीकरण करणे. | रु. १०,५२,३१०/- |

| | | |
|---|---|---|
| ३ | पाली पाटणूस रस्ता रा. मा. ९३ कि. मी.९/६०० ते १०/४५० रुंदीकरण करणे. | रु. १५,७३,४६२/- |
| ४ | पाली पाटणूस रस्ता रा. मा. ९३ कि. मी. १०/४५० ते ११/०० रुंदीकरण करणे. | रु. १०,५३,०५९/- |
| | एकूण : | रु. ५२,४०,९७२/- |

(१) प्रशासकीय मंजूरीच्या रकमेपेक्षा जास्त खर्च करु नये तसेच निधी प्राप्त झाल्याशिवाय कोणतेही काम सुरु करु नये.

(२) शासनाची मार्गदर्शक तत्वे व मापदंडे याची कटाक्षाने पालन करावे.

(४) कोणत्याही परिस्थितीत काम वित्तीय वर्षात पूर्ण करावे व निधी व्यपगत होणार नाही याची दक्षता घ्यावी.

(५) सदर कामाचा आर्थिक व भौतिक प्रगतीचा अहवाल दर महिन्याच्या १० तारखेस शासनास पाठवावा.

(६) आवश्यक त्या कामांना तांत्रिक मंजूरी देणे बंधनकारक आहे.

२. यासाठी होणारा खर्च ३४५२-पर्यटन मागणी क्र. बी-७ -०१-पर्यटनासाठी पायाभूत सुविधा-१०१-पर्यटन केंद्रे (०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना-(०२)(१८) पर्यटन विकासासाठी विविध ठिकाणी मुलभुत सुविधाकरिता अनुदान (३४५२ १७७१) या लेखाशिर्षाखाली सन २००५-२००६ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत केलेल्या निधीतून खर्ची टाकण्यात यावा यासंदर्भात निधी उपलब्ध झाल्याखेरीज संदर्भाधीन खर्च करण्यात येवू नये.

७. हा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचे अनौपचारिक संदर्भ, अनुक्रमांक ३९/१४१२, दिनांक १७.५.२००५ व सीआर-३८६ (व्यय-८), दिनांक १३.६.२००५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( र. ना. अंबरित )

उप सचिव,महाराष्ट्र शासन,गृह विभाग,

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,

महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
विभागीय आयुक्त, कोकण
जिल्हाधिकारी, रायगड,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय.रायगड.
जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड,
प्रादेशिक व्यवस्थापक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, रत्नागिरी,
मुख्य अधिकारी, मुरुड-जंजिरा नगरपालिका.
मुख्य अधिकारी, रायगड नगर परिषद
कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग, जिल्हा परिषद, रायगड,
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, महाड, जि. रायगड,
नियोजन विभाग (का.१४१२) मंत्रालय, मुंबई,
वित्त विभाग (का. व्यय-८/अर्थोपाय)मंत्रालय, मुंबई,
निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन.

प्रत माहितीसाठी सादर.
मा. मंत्री (वित्त ) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
मा. मंत्री ( पर्यटन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
मा.राज्यमंत्री (पर्यटन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव (पर्यटन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.